कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-११२३/प्र.क्र. १०५/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३० जून, २०२३.

**संदर्भ :** सा. बां. विभाग शासन आदेश क्र.: टीएफएस-११२३/प्र.क्र. १०५/सेवा-१, दिनांक २५.५.२०२३

**शासन आदेश :-**

संदर्भिय आदेशान्वये कार्यकारी अभियंता (स्था) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (१) (२) व ४ (३) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, बदलीने पदस्थापना करण्यात आलेली आहे. सदर आदेशातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ३ मध्ये नमूद केलेल्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करण्यात येत असून, त्यांची सुधारित पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | संदर्भिय आदेशान्वये दिलेली पदस्थापना | सुधारित पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. सतिश पांडुरंग अंभोरे जागतिक बँक प्रकल्प विभाग, नागपूर | महाराष्ट्र ग्रामिण रस्ते विकास संस्था, वाशिम | सार्वजनिक बांधकाम विभाग, वर्धा |
| २. | श्रीम. कृष्णा सुरेश घरडे जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, भंडारा | सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, गोंदिया | जागतिक बँक प्रकल्प विभाग, नागपूर |
| ३. | श्री. प्रविण रा. सरनायक जागतिक बँक प्रकल्प विभाग, अकोला | महाराष्ट्र ग्रामिण रस्ते विकास संस्था, बुलढाणा | सध्याच्या पदावर पुढील वर्षाच्या नियतकालिक बदलीपर्यंत मुदतवाढ |
| ४. | श्री. संजय श्री. साहुत्रे राष्ट्रीय महामार्ग विभाग, नांदेड | जागतिक बँक प्रकल्प विभाग, अकोला | सार्वजनिक बांधकाम विभाग, पांढरकवडा, जि. यवतमाळ |
| ५. | श्री. नरसिंग वि. भंडे जागतिक बँक प्रकल्प विभाग, औरंगाबाद | जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, औरंगाबाद | बांधकाम विभाग, उस्मानाबाद |
| ६. | श्री. प्रशांत पां. पाटील सार्वजनिक बांधकाम (इमारती) विभाग, पुणे | बांधकाम विभाग, उस्मानाबाद | मार्ग प्रकल्प विभाग क्र. ४, अंधेरी, मुंबई |

| | | | |
|---|---|---|---|
| ७. | श्री. सु. ह. साखरवाडे सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, गडचिरोली | नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई (मुख्यालय स्तर) | सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, गडचिरोली |
| ८. | श्री. शालीकराव दे. उसेंडी सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, गडचिरोली | सध्याच्या पदावर मुदतवाढ | सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, गोंदिया |

२. वर नमूद अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी म. ना. से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहिल. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, वर नमूद अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. वरील तत्क्यातील बदली झालेल्या अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६३०१९२७०५१२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR
MAHAJAN
GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.06.30 19:28:06 +05'30'

**( गंगाधर म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/नांदेड/ अमरावती/ नागपूर /राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
५. मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र राज्य, मुंबई,

६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
११. सर्व संबंधित अधिकाऱ्यांना मुख्य अभियंता कार्यालयामार्फत,
१२. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१४. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१५. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सार्वजनिक बांधकाम विभाग, आस्था-१, आस्था- २, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
१७. निवडनस्ती.